**राज्य सार्वजनिक उपक्रमांच्या (भांडवली अर्थसंकल्प) पुनर्विलोकन समितीची पुनर्रचना**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय क्रमांक : शासाउ-२००१/प्र.क्र.१८/सा.उ.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ११ डिसेंबर, २००१

वाचा :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पीएसयु-१०८२/प्र.क्र.५३/८२/जीईएन-३ दिनांक २३ ऑगस्ट, १९८२.

## शासन निर्णय

१. राज्य शासनाच्या सार्वजनिक उपक्रमांच्या कामकाजाबाबत समन्वय साधण्यासाठी तसेच त्यांच्या कामकाजाचे पुनर्विलोकन करण्यासाठी, संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २३.८.१९८२ अन्वये, मा. मंत्री (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली राज्य शासकीय उपक्रम पुनर्विलोकन समिती स्थापन करण्यात आली होती. या समितीकडे सोपविण्यात आलेल्या कामकाजांमध्ये प्रामुख्याने राज्य शासनाच्या उपक्रमांच्या वार्षिक भांडवली अर्थसंकल्प प्रस्तावाची तपासणी करणे तसेच त्यांच्या कार्यक्रमासाठी शासनाने द्यावयाच्या आर्थिक मदतीची रक्कम ठरविणे हे होते.

२. संदर्भाधीन दिनांक २३.८.१९८२ च्या आदेशात फेरबदल करून राज्य सार्वजनिक उपक्रम पुनर्विलोकन समितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| (१) | मा.मंत्री (वित्त) | - अध्यक्ष |
| (२) | ज्या उपक्रमाच्या अर्थसंकल्पाची छाननी केली जात आहे, त्या उपक्रमाशी संबंधित प्रशासनिक विभागांचे प्रभारी मंत्री | - सदस्य |
| (३) | मा. राज्यमंत्री (वित्त) | - सदस्य |
| (४) | मुख्य सचिव | - सदस्य |
| (५) | प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग | - सदस्य |
| (६) | प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग | - सदस्य |
| (७) | सार्वजनिक उपक्रम कक्ष यांचे प्रभारी सचिव, वित्त विभाग | - सदस्य |
| (८) | ज्या उपक्रमाच्या अर्थसंकल्पाचे पुनर्विलोकन केले जात आहे त्या उपक्रमाच्या प्रशासनिक विभागाचे अतिरीक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव | - सदस्य |
| (९) | संबंधित उप सचिव, वित्त विभाग | - सचिव |

३. उपक्रमांनी भांडवली अर्थसंकल्पाचे प्रस्ताव सादर करणे, प्रशासकीय विभागात त्या प्रस्तावांची तपासणी करणे तसेच नियोजन व वित्त विभागाकडून छाननी करून प्रस्ताव पुनर्विलोकन समितीस सादर करण्याकरीता विहित करण्यात आलेल्या वेळापत्रकानुसार उपक्रमांनी वित्तीय वर्षातील ३० जूनपर्यंत भांडवली अर्थसंकल्पाचे प्रस्ताव सादर करावयाचे असून विभागाकडून प्रस्तावाची छाननी करुन नस्ती नियोजन विभागास १५ जुलैपर्यंत सादर करावयाची आहे. नियोजन विभागाने प्रस्तावाची छाननी करुन नस्ती वित्त विभागास पुनर्विलोकन समितीच्या मान्यतेकरीता ३१ जुलैपर्यंत सादर करावयाची आहे. त्यानंतर आवश्यकता भासल्यास उपक्रमनिहाय बैठका आयोजित करून उपक्रमांच्या भांडवली अर्थसंकल्पास पुनर्विलोकन समितीने मान्यता द्यावयाची आहे.

४. राज्य शासनाच्या सार्वजनिक उपक्रमांची (दुय्यम कंपन्या वगळून) संख्या सध्या ६३ इतकी असून या उपक्रमांची यादी जोडपत्र-१ मध्ये दर्शविण्यात आली आहे. सदर प्रपत्रातील उपक्रमांपैकी जोडपत्र-२ मध्ये दर्शविलेल्या उपक्रमांच्या भांडवली अर्थसंकल्पाचा सखोल आढावा घेण्याचे प्रस्तावित असून या उपक्रमांचे भांडवली अर्थसंकल्पाचे प्रस्ताव वरील परिच्छेद-३ मध्ये विहित करण्यात आलेल्या वेळापत्रकानुसार संबंधित प्रशासकीय विभागात छाननी होऊन सदर प्रस्ताव नियोजन विभागामार्फत वित्त विभागात प्राप्त झाल्यानंतर पुनर्विलोकन समितीस सादर करण्यात येतील व तद्नंतर या उपक्रमांच्या भांडवली अर्थसंकल्पास मान्यता देण्यात येईल.

५. सोबतच्या जोडपत्र-३ मध्ये दर्शविलेल्या उपक्रमांच्या भांडवली अर्थसंकल्पाचे प्रस्ताव पुनर्विलोकन समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्याऐवजी यापुढे सदर प्रस्ताव प्रशासनिक विभागात विहित वेळापत्रकानुसार तपासणी होऊन नियोजन विभागामार्फत वित्त विभागात प्राप्त झाल्यानंतर वित्त विभागातील संबंधित सचिव यांच्या स्तरावर सम्मत करण्यात येतील. वित्त विभागाने प्रस्तावास सम्मती दिल्यानंतर उपक्रमाशी संबंधित प्रशासनिक विभागाच्या प्रभारी मंत्रिमहोदयांच्या मान्यतेने मंजूरीचे आदेश निर्गमित करावेत. सदर प्रस्तावावरील वित्त व नियोजन विभागाच्या अभिप्रायाशी संबंधित प्रशासनिक विभागाचे प्रभारी मंत्री सहमत नसल्यास असे प्रस्ताव पुनर्विलोकन समितीच्या निर्णयार्थ सादर करण्यात येतील.

६. सोबतच्या जोडपत्र-४ मध्ये दर्शविलेल्या उपक्रमांच्या बाबतीत संबंधित प्रशासनिक विभागांनी भांडवली अर्थसंकल्पाची सविस्तर छाननी करावी व त्याबाबत विभागाच्या प्रभारी मंत्र्यांच्या मान्यतेने आदेश पारित करावेत. जोडपत्र-४ मधील ३५ उपक्रमांच्याबाबतीत भांडवली अर्थसंकल्पास मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात येत आहेत. मात्र योजनांतर्गत तरतूदींच्याबाबतीत नियोजन विभागाची मान्यता आवश्यक राहिल. तसेच संबंधित उपक्रमांना शासकीय अंदाजपत्रकातून देण्यात येणाऱ्या योजनेतर कर्ज किंवा सहाय्यक अनुदानाची रक्कम मागील वर्षाच्या तरतूदीच्या तुलनेने जास्त होणार नाही हे विभागांनी पहावयाचे असून सदर अट प्रशासनिक विभागांवर बंधनकारक राहील. प्रशासनिक विभागांना संबंधित उपक्रमांचे भांडवली अर्थसंकल्प मंजूर करतांना विशेषत: महसूली खर्चासंबंधात वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले मार्गदर्शक सूचना तसेच वाहन वापर,

नवीन पद निर्मिती, पदांचे पुनरूज्जीवन आणि पदभरती व काटकसरीच्या नवीन उपाययोजना या संदर्भातील आदेश बंधनकारक राहतील. या पध्दतीने प्रशासनिक विभागामार्फत अंतिमत: मान्य केलेल्या प्रस्तावाबाबतीतील उपक्रम निहाय आदेशाची प्रत त्या विभागाने वित्त व नियोजन विभागास पृष्ठांकित करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सुधीर श्रीवास्तव)
सचिव (लेखा व कोषागारे)
वित्त विभाग

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
प्रधान सचिव, नियोजन विभाग
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग
प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग
सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग
शासनाचे सर्व अतिरीक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व राज्य सार्वजनिक उपक्रमांचे व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, सार्वजनिक उपक्रम

**जोडपत्र-१**

## सार्वजनिक उपक्रमांची विभागवार यादी

अ. **उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

१) कोकण विकास महामंडळ मर्यादित
२) विदर्भ विकास महामंडळ मर्यादित
३) मराठवाडा विकास महामंडळ मर्यादित
४) पश्चिम महाराष्ट्र विकास महामंडळ मर्यादित
५) महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक्स महामंडळ मर्यादित
६) महाराष्ट्र पेट्रोकेमिकल महामंडळ मर्यादित
७) महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ
८) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण
९) महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ
१०) महाराष्ट्र खादी-ग्रामोद्योग मंडळ
११) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ
१२) महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळ

ब. **सामान्य प्रशासन विभाग**

१३) यशवंतराव चव्हाण प्रशासन प्रबोधिनी

क. **कृषि व पदुम विभाग**

१४) महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित
१५) मॅफको मर्यादित
१६) महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ मर्यादित
१७) महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित
१८) महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ मर्यादित

ड. **सहकार आणि वस्त्रोद्योग विभाग**

१९) महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्यादित
२०) महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्यादित
२१) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ मर्यादित
२२) महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महामंडळ मर्यादित
२३) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ
२४) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ
२५) महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ
२६) महाराष्ट्र राज्य सहकारी तेलबिया उत्पादक महासंघ
२७) महाराष्ट्र सहकारी विकास महामंडळ मर्यादित

इ. **पर्यावरण विभाग**

२८) महाराष्ट्र राज्य प्रदुषण नियंत्रण मंडळ

फ. **सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग**

२९) कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित
३०) महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमि आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित
३१) महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्यादित
३२) लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्यादित
३३) वसंतराव नाईक विमुक्त जाती आणि भटक्या जमाती विकास महामंडळ मर्यादित
३४) महाराष्ट्र राज्य चर्मोद्योग विकास महामंडळ मर्यादित
३५) महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग विकास महामंडळ मर्यादित

ग. **आदिवासी विकास विभाग**

३६) महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित
३७) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित

ह. **महिला व बाल कल्याण विभाग**

३८) महिला आर्थिक विकास महामंडळ मर्यादित

ख. **वैद्यकीय शिक्षण आणि औषधी द्रव्ये विभाग**

३९) हाफकिन बायो-फार्मास्युटिकल महामंडळ मर्यादित
४०) हाफकिन प्रशिक्षण, संशोधन आणि चाचणी संस्था

घ. **महसुल व वन विभाग**

४१) महाराष्ट्र राज्य शेती महामंडळ मर्यादित
४२) महाराष्ट्र राज्य वन विकास महामंडळ मर्यादित

च. **गृह विभाग**

४३) महाराष्ट्र मार्ग परिवहन महामंडळ
४४) महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित
४५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित
४६) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड

छ. **व्यापार, वाणिज्य आणि खनिकर्म विभाग**

४७) महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्यादित
४८) महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित

झ. **नगर विकास विभाग**

४९) महाराष्ट्र शहर व औद्योगिक विकास महामंडळ मर्यादित
५०) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणृ

न. **गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग**

५१) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा)

५२)	शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित

य.	**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

५३)	महाराष्ट्र जीवन प्राधिकरण

व.	**पाटबंधारे विभाग**

५४)	महाराष्ट्र भूविकास महामंडळ मर्यादित
५५)	महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ
५६)	विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ
५७)	तापी पाटबंधारे विकास महामंडळ
५८)	कोकण पाटबंधारे विकास महामंडळ
५९)	गोदावरी-मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ

श.	**सार्वजनिक बांधकाम विभाग**

६०)	महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित

र.	**रोजगार व स्वयंरोजगार विभाग**

६१)	अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित
६२)	मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित

स.	**ग्राम विकास व जल संधारण विभाग**

६३)	महाराष्ट्र जल संधारण महामंडळ

**<u>जोडपत्र-२</u>**

**<u>पुनर्विलोकन समितीच्या मान्यतेकरीता भांडवली अर्थसंकल्पाचे प्रस्ताव सादर करावयाच्या सार्वजनिक उपक्रमांची यादी</u>.**

१. महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ
२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
३. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ
४. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित
५. महाराष्ट्र जलसंधारण विकास महामंडळ
६. महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ
७. पाटबंधारे विभागांतर्गत सिंचन विकास महामंडळे :-
    अ) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ
    ब) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ
    क) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ
    ड) तापी पाटबंधारे विकास महामंडळ
    इ) गोदावरी-मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ

## जोडपत्र-३

**नियोजन व वित्त विभागाच्या सल्ल्याने भांडवली अर्थसंकल्प सम्मत करावयाच्या सार्वजनिक उपक्रमांची यादी**

१. महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महामंडळ मर्यादित
२. महाराष्ट्र चर्मोद्योग विकास महामंडळ मर्यादित
३. महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित
४. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित
५. महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमि आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित
६. हाफकिन जीव-औषध निर्माण महामंडळ मर्यादित
७. महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळ
८. महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित
९. लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्यादित
१०. महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्यादित
११. वसंतराव नाईक विमुक्त जमाती, भटक्या जाती विकास महामंडळ मर्यादित
१२. अण्णासाहेब पाटील आर्थिक विकास महामंडळ मर्यादित
१३. शबरी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित
१४. महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ मर्यादित
१५. मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित
१६. महाराष्ट्र सागरी मंडळ
१७. महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित

## जोडपत्र-४

**संबंधित प्रशासनिक विभागाने भांडवली अर्थसंकल्प मान्य करावयाच्या सार्वजनिक उपक्रमांची यादी**

१. महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ
२. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण
३. सिडको मर्यादित
४. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण
५. महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळ मर्यादित
६. महाराष्ट्र राज्य कापूस उत्पादन पणन महासंघ
७. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ
८. महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक्स महामंडळ मर्यादित
९. महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्यादित
१०. महाराष्ट्र पेट्रोकेमिकल्स महामंडळ मर्यादित
११. महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ
१२. मॅफको मर्यादित
१३. महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित
१४. महाराष्ट्र राज्य शेती महामंडळ मर्यादित
१५. कोकण विकास महामंडळ मर्यादित
१६. विदर्भ विकास महामंडळ मर्यादित
१७. मराठवाडा विकास महामंडळ मर्यादित
१८. पश्चिम महाराष्ट्र विकास महामंडळ मर्यादित
१९. महाराष्ट्र शेळी व मेंढी विकास महामंडळ मर्यादित
२०. महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ मर्यादित
२१. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्यादित
२२. महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्यादित
२३. कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित
२४. महिला आर्थिक विकास महामंडळ मर्यादित
२५. महाराष्ट्र राज्य सहकारी हातमाग महासंघ
२६. महाराष्ट्र तेलबिया उत्पादन पणन महासंघ
२७. शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित
२८. महाराष्ट्र भूविकास महामंडळ मर्यादित
२९. महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित
३०. महाराष्ट्र खादी व ग्रामोद्योग मंडळ
३१. महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ
३२. हाफकिन प्रशिक्षण, संशोधन आणि चाचणी संस्था
३३. महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ
३४. महाराष्ट्र ऊर्जा विकास प्राधिकरण
३५. यशवंतराव चव्हाण प्रशासन प्रबोधिनी

********